**ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सुरु असलेल्या सरल प्रणाली व शालार्थ प्रणालीसाठी कार्यरत तांत्रिक मनुष्यबळांच्या सेवा शुल्कापोटी आगाऊ निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-०६२२/प्र.क्र.१५/संगणक**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- ०८ ऑगस्ट, २०२३

वाचा :-

१. सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, शासन निर्णय क्र.मातंसं २०२२/प्र.क्र.४७/से-२/३९, दिनांक २७ सप्टेंबर, २०२२.
२. दि.२५ एप्रिल, २०२३ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.आशिका/२०२३/ई-गव्ह./Maha IT pay/ १४३/ ०३७८२, दि. २२.०६.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून तांत्रिक मनुष्यबळ पुरविण्यासाठी कार्यपध्दती संदर्भाधीन क्र.१ नुसार विहीत करण्यात आलेली आहे. या शासन निर्णयानुसार महामंडळाच्या प्रोफार्मा देयकानुसार विभागांनी/संबंधित कार्यालयांनी आकारणी केलेली रक्कम अधिक अनुज्ञेय कर महामंडळास आगाऊ अदा करावा. सदर रक्कम जमा झाल्यानंतरच महामंडळाकडून सर्व संबंधित कार्यालयांना मनुष्यबळ उपलब्ध करण्यात येईल असे नमूद करण्यात आले आहे. ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सुरु असलेल्या सरल प्रणाली व शालार्थ प्रणालीसाठी सध्या कार्यरत असलेल्या तांत्रिक मनुष्यबळाची सेवा दि. ३१ मार्च,२०२३ रोजी संपली आहे. तथापि, सदर तांत्रिक मनुष्यबळाच्या सेवा यापुढील काळात देखील आवश्यक आहेत. त्यानुषंगाने दि.२५.०४.२०२३ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये ई-गर्व्हनन्स अंतर्गत सरल प्रणालीसाठी सद्यस्थितीत मंजूर २८ व शालार्थ प्रणालीसाठी मंजूर १० अशा एकूण ३८ तांत्रिक मनुष्यबळाला मार्च, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. त्यामुळे सध्या कार्यरत संगणक तज्ञांचे माहे एप्रिल, २०२३ ते जुन, २०२३ या कालावधीचे सेवाशुल्क अदा करण्यासाठी आयुक्त शिक्षण, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने ई-गव्हर्नस कार्यक्रमांतर्गत सुरु असलेलया सरल व शालार्थ प्रणालीसाठी कार्यरत तांत्रिक मनुष्यबळांच्या सेवा शुल्कापोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

२. ई-गर्व्हनन्स अंतर्गत सरल व शालार्थ प्रणालीचे काम पाहण्यासाठी माहे एप्रिल, २०२३ ते जुन, २०२३ या कालावधीकरीता मंजूर तांत्रिक मनुष्यबळाच्या मानधनाची रु. ५३,०४,३८८ /- (अक्षरी रक्कम रुपये त्रेपन्न लक्ष, चार हजार, तीनशे अठ्याऐंशी फ़क्त) इतकी रक्कम Maha IT कंपनी ला आगाऊ अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च “मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H४५४ ) ३१ सहायक अनुदाने” या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक, (लेखा ) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४९ /व्यय-५, दिनांक ०२.०६.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०८१५३७१३७३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.08.08 15:38:49 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.